कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग व त्या अधिनस्त कार्यालयांकरीता माहिती सल्लागारांची नियुक्ती करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार ,उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०२२/प्र.क्र.९४/प्रशा-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२४.

**वाचा:-** १. शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.मातंस ०८०/४/२०१४-O/O DIT, दिनांक ०९ मे, २०१९
२. विभागाचे पत्र क्र.कौविउ-२०२२/प्र.क्र.०१/कौशल्य-१, दिनांक १३ मे, २०२२
३. विभागाचा शासन निर्णय, क्र. कौविउ-२०२२/प्र.क्र.९४/प्रशा-१, दि.२९ जुलै, २०२२.

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन क्र.३ येथील दि.२९ जुलै, २०२२ अन्वये KPMG या संस्थेमार्फत नियुक्त करण्यात आलेल्या सल्लागारांची वेतन देयके विभागाच्या ई-गव्हर्नन्स योजनेंतर्गत अदा करण्यात येत होते. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता ई-गव्हर्नन्स या योजनेंतर्गत २२३० ६१०९ या लेखाशिर्षाखाली १७- संगणक खर्च या उद्दिष्टाखाली रु.५०.०० लक्ष व २८- व्यावसायिक सेवा या उद्दिष्टाखाली रु.४९०.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. त्यानुसार संदर्भ क्र.३ येथील दि.२९ जुलै, २०२२ च्या शासन निर्णयानुसार १७- संगणक खर्च या उद्दिष्टाखाली पुरेसा निधी उपलब्ध नसल्याने KPMG या संस्थेची देयके अदा करण्याकरीता पुनर्विनियोजनाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबत नियोजन विभागास विनंती करण्यात येत होती. तद्नंतर पुनर्विनियोजनाद्वारे निधी वळवून घेवून आदेश पारीत करावे लागत होते. सदर बाब टाळण्याच्या दृष्टीने दि.२९ जुलै, २०२२ च्या शासन निर्णयात अंशत: दुरुस्ती करणेबाबत नियोजन विभाग व वित्त विभागास विनंती करण्यात आली. त्यानुसार KPMG या संस्थेची देयके २८- व्यावसायिक सेवा या उद्दिष्टामधून अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र.३ येथील दि.२९ जुलै, २०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार KPMG Advisory Services Pvt. Ltd. या संस्थेची देयके २८- व्यावसायिक सेवा या उद्दिष्टामधून अदा करण्याकरीता या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. KPMG या संस्थेमार्फत नियुक्त करण्यात आलेल्या सल्लागारांच्या वेतनाकरीता होणारा खर्च मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, (०१)(०७) ई-प्रशासन, २८-व्यावसायिक सेवा, २२३० ६१०९ या लेखाशिर्षाखाली वेळीवेळी उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२८/१४७१, दि.५ मार्च, २०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७५/व्यय-६, दि.१३ मार्च, २०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२०१४५७५७२५०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRABHAKAR ATMARAM SANKHE

Digitally signed by PRABHAKAR ATMARAM SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR ATMARAM SANKHE
Date: 2024.03.20 15:08:06 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
२) अपर मुख्य सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
३) सह सचिव/उपसचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांचे स्वीय सहाय्यक
४) अवर सचिव (रोखशाखा), कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग
५) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
६) Director, KPMG Advisory Services Pvt. Ltd., २nd Floor, Block T२(B wing), Lodha Excellus,Apollo Mills Compound, N.M. Joshi Marg, Mahalaxmi, Mumbai-४०० ००१
७) कक्ष अधिकारी (व्यय-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) कक्ष अधिकारी (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) निवडनस्ती (प्रशा-१)